**राज्यातील कारागृहे व न्यायालये या दरम्यान व्हीडीओ कॉन्फरन्सिंग यंत्रणा सुरु करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. एमआयएस २००२/प्र.क्र.१३/पीआरएस-२**

**मंत्रालय, मुंबई-३२, दि. १४ जानेवारी, २००५**

**वाचा : १. शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३ नोव्हेंबर, २००४**
**२. शासन पत्र, गृह विभाग क्रमांक : एसयुपी ११/०४/प्र.क्र.९४/बीयुडी-१**
**दिनांक : ५ जानेवारी, २००५**

**<u>शासन निर्णय</u> :-** न्यायालय व कारागृहामध्ये संपर्क साधणे तसेच कैद्यांना न्यायालयापुढे सुनावणीकरिता हजर ठेवण्यासाठी पोलीस यंत्रणेवर पडणारा ताण तसेच जोखिम कमी करण्यासाठी बृहन्मुंबईतील मुंबई मध्यवर्ती कारागृह, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे आणि बृहन्मुंबईतील माझगांव, बोरीवली व दादर येथील महानगर दंडाधिकारी न्यायालये, या दरम्यान एकुण ५ ठिकाणी प्रायोगिक तत्वावर भाडे पध्दतीने महानगर टेलीफोन निगम लिमीटेड, मुंबई यांचेकडून व्हिडीओ कॉन्फरन्सिंग सेवा सुरु करण्याचा निर्णय शासनाने घेतला होता. याकरीता शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३.११.२००४ अन्वये सन २००४-०५ या आर्थिक वर्षाकरीता द्यावयाच्या भाड्यापोटी रु. ४,५०,०००/- (रुपये चार लाख पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास मंजुरी देण्यात आली होती. याकरिता आकस्मिकता निधीमधून अग्रीम मंजूर करण्यात आला होता. तसेच डिसेंबर २००४ च्या विधिमंडळ अधिवेशनात आकस्मिकता निधीच्या प्रतिपूर्तीसाठी तसेच सन २००४-०५ या आर्थिक वर्षातील उर्वरित महिन्यांच्या भाड्यापोटी येणारा खर्च भागविण्यासाठी रु. ११,२५,०००/- (रुपये अकरा लाख पंचवीस हजार फक्त) इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आलेली आहे. सदर अनुदान महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २००४ (सन २००४ चा महाराष्ट्र अधिनियम, क्रमांक १७) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४ दिनांक २४ डिसेंबर, २००४ मध्ये प्रसिध्द करुन संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना सुपुर्त करण्यात आलेले आहे.

मुंबई उच्च न्यायालयात दाखल असलेल्या याचिका क्र. ३८६/२००४ व इतर संदर्भात दिनांक २.१२.२००४ रोजी झालेल्या सुनावणीवेळी बृहन्मुंबई मध्ये आणखी बारा ठीकाणी व्हीडीओ कॉन्फरन्सींग सेवा सुरु करण्यासाठी राज्य शासनाने निधी उपलब्ध करुन द्यावा असे आदेश दिले होते.

सबब मा. उच्च न्यायानलयाने दिलेल्या निदेशांस अनुसरुन यापूर्वी मंजूरी दिलेल्या पांच ठिकाणां व्यतिरिक्त गिरगांव न्यायालय, वांद्रे न्यायालय, अंधेरी न्यायालय, मुलूंड न्यायालय, विलेपार्ले न्यायालय, मुंबई सेंट्रल न्यायालय, बॅलार्ड पियर न्यायालय, जुवेनाईल न्यायालय, शिंदेवाडी न्यायालय, भोईवाडा न्यायालय, कुर्ला न्यायालय, विक्रोळी न्यायालय या महानगर दंडाधिकारी न्यायालयांसह एकूण १७ ठिकाणी व्हीडीओ कॉन्फरन्सींग सेवा सुरु करण्यास शासन याद्वारे मंजुरी देत आहे.

बृहन्मुंबईमध्ये एकुण १७ ठिकाणी एमटीएनएल कडून व्हिडीओ कॉन्फरन्सींग सेवा भाडेतत्वावर घेण्याकरिता प्रत्येक ठिकाणी रु. ४५,०००/- प्रतिमहीना याप्रमाणे रु. ७,६५,०००/- इतका खर्च येणार आहे. पुरक मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु. ११,२५,०००/- इतक्या निधीमधून सदर खर्च भागविण्यात यावा. हा खर्च "२०५६ तुरुंग, ००१ संचालन व प्रशासन, (००)(०१) कारागृह निरीक्षणालय (२०५६००२६)" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर ३५/२००५/व्यय-८, दि. ११.०१.२००५ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(किरण ठाकूर)
उपसचिव, महाराष्ट्र शासन
गृह विभाग

प्रत,
- महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- प्रबंधक, मुख्य महानगर दंडाधिकारी न्यायालय, मुंबई
- प्रबंधक, महानगर दंडाधिकारी न्यायालय, माझगांव, बोरीवली,दादर, मुंबई.
- कारागृह उपमहानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.
- अधिक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह, मुंबई.
- अधिक्षक, ठाणे मध्यवर्ती कारागृह, ठाणे.
- महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
- अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नविन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई (दोन प्रती)
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८ / वित्तीय सुधारणा-१ / अर्थसंकल्प-३ / अर्थसंकल्प-१०, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२.

**********